**महाराष्ट्र शासन**

क्रमांक: बीयुडी १६२१/प्र.क्र.११९/२८-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक: ३१ मार्च, २०२२

**विषय :-** राज्यातील विमानतळांच्या विकासासाठी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस अनुदान वितरीत करणेबाबत.

**वाचा :-** १.महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांचे अ.शा. पत्र क्र. म.वि.वि.कं. २०१७/प्र.क्र.१३८/भुसं/१२०२, दि.२८.०१.२०२२.
२.शासन ज्ञापन क्र.म.वि.वि-१२१६/प्र.क्र. १४४/२८-अ, दि. २१ मार्च, २०२२.
३. शासन शुध्दीपत्रक क्र.म.वि.वि-१२१६/प्र.क्र. १४४/२८-अ, दि.२८ मार्च, २०२२.

**शासन ज्ञापन :-**

राज्यातील विमानतळांच्या विकासासाठी कार्यक्रम लेखाशीर्ष ३०५३-०१६४, ३१-सहायक अनुदाने खाली निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात या लेखाशीर्षाखाली रु.३००.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केला आहे. आता सन २०२१-२२ या वर्षासाठी लेखाशिर्षासाठी रु.१८०.०० कोटी सुधारित अंदाज आहे. आतापर्यंत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात या लेखाशीर्षाखाली महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस रु.२६.०० कोटी निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

२. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष ३०५३-०१६४ खाली सुधारित अंदाजाच्या मर्यादेत RCS साठी **रु.३२.०० कोटी** निधी वितरणास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. या अनुषंगाने RCS साठी रु.३२.०० कोटी (अक्षरी रक्कम रुपये बत्तीस कोटी फक्त) निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे.

**योजनेचे नाव- - मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ , १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर).**

**(रक्कम कोटीत)**

| अ.क्र. | बाब | सन २०२१-२२ ची मूळ अर्थसंकल्पिय तरतूद | सन २०२१-२२चा सुधारित अंदाज | सन २०२१-२२ मध्ये वितरीत करण्यात आलेली रक्कम | आता वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १. | RCS साठी | रु. ३००.०० कोटी | रु. १८०.०० कोटी | रु. २६.०० कोटी | रु.३२.०० कोटी |
| | एकूण | रु. ३००.०० कोटी | रु. १८०.०० कोटी | रु. २६.०० कोटी | रु.३२.०० कोटी |

**(एकूण अक्षरी रक्कम रुपये बत्तीस कोटी फक्त)**

३. उपरोक्त खर्च "मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १०२ विमानक्षेत्र, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे, (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व

संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो दि.३१ मार्च २०२२ पूर्वी खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. हे शासन ज्ञापन वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२१८/२०२२/व्यय-४, दि. ३०.०३.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र.२०२२०३३११०४६३३१००७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Mahesh Kisan Wavhal

Digitally signed by Mahesh Kisan Wavhal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, serialNumber=495c75b4c173c81f308bd63a1b33a5da4ea131ed182d44ea1b502ab4662e9810, cn=Mahesh Kisan Wavhal
Date: 2022.04.05 11:24:38 +05'30'

**( महेश वाव्हळ )**
**अवर सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल,( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती